**बालकामगार प्रथा (प्रतिबंध व नियमन)**
**कायदा, १९८६ ची अंमलबजावणी**
**सन २०१६-१७ - कृती आराखडा**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक सीएलए २०१६/प्र.क्र. २०९/कामगार-४**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १ डिसेंबर, २०१६.

**वाचा :** १) शासन परिपत्रक उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र : बीयुडी २०१६/२०१६-२०१७/ प्र.क्र.५०/प्रशासन-१, दिनांक ०६.०५.२०१६.
२) कामगार आयुक्त यांचे पत्र क्र.ग्रावि/बाका/बजेट/२०१६-१७/विनियोग-शानि/कार्या-१२/१४२६, दिनांक १४.०६.२०१६.
३) कामगार आयुक्त यांचे पत्र क्र.ग्रावि/बाका/दूरदर्शन देयक/२०१६-१७/कार्या-१२/२२७०, दिनांक २२.०८.२०१६.
४) शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र : सीएलए २०१५/प्र.क्र. २८९/कामगार-४, दिनांक ०१.१२.२०१६.

**प्रस्तावना :**

बालकामगार (प्रतिबंध व नियमन), कायदा १९८६ ची अंमलबजावणी तसेच बालमजुरी विरुध्द व्यापक जनजागृती कार्यक्रमासाठीचा धोरणात्मक निर्णय शासनाने शासन निर्णय दिनांक २०.१.२०११ अन्वये घेतला आहे. तसेच दिनांक ७.१२.२०११ च्या शासन निर्णयाद्वारे बालकामगार राज्य कृती आराखडयामध्ये देखील व्यापक बदल केले आहेत.

बालकामगार प्रथेचे निर्मूलन करण्यासाठी जाहिरातीच्या माध्यमातून जनसामान्यांपर्यंत पोहोचणे आणि जनसहभागातून ही प्रथा नष्ट करणे या उद्देशाने सदर योजनेची जाहिरात प्रसिध्द करण्यासाठी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरीता रुपये १,९८,४०,०००/- एवढया रकमेचा नियतव्यय मंजूर केला असून त्यापैकी ७५% म्हणजेच रुपये १,४८,७८,०००/- इतकी रक्कम संगणक प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध करुन देण्यात आली आहे. यापैकी, सन २०१५-१६ या गत आर्थिक वर्षातील बालकामगार प्रथेविरुध्द जनजागृती करण्यासाठी दूरदर्शनच्या सहयाद्री वाहिनीवरील जाहिरात प्रसिध्दीवरील प्रलंबित देयकावरील खर्च रुपये १९,७०,८३१/- याआर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यास संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. तर, याच प्रयोजनार्थ या वर्षी दूरदर्शनवरील सहयाद्री वाहिनीवर जाहिरात करण्यासाठी रु.८,७८,०००/- रक्कम चालू आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यास शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची कार्यवाही स्वतंत्र नस्तीवर करण्यात येत आहे.

कामगार आयुक्त यांचेकडून प्राप्त प्रस्तावानुसार सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात बालकामगार कृती आराखडयाच्या अंमलबजावणीच्या दृष्टीने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे :

**शासन निर्णय :**

सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरीता रुपये १,९८,४०,०००/- एवढया रकमेचा नियतव्यय मंजूर केला असून त्यापैकी ७५ % म्हणजेच रुपये १,४८,७८,०००/- इतकी रक्कम संगणक प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध करुन देण्यात आली आहे. कामगार आयुक्त यांनी प्रस्तावित केलेल्या बाबींवर वर उल्लेखित दूरदर्शनच्या सहयाद्री वाहिनीवरील जाहिरात प्रसिध्दीवरील खर्च वजा जाता उर्वरित अनुदानातून पुढीलप्रमाणे खर्च करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | जनजागृती कार्यक्रम | खर्चास मान्यता रक्कम (रुपये) |
|---|---|---|
| १ | दै.मराठी वृत्तपत्रातील जाहिरातीसाठी | १५,००,००० |
| २ | एस.टी.बसेसवरील साईड व बॅक पॅनल | ६०,००,००० |
| ३ | बेस्ट बसेसवरील साईड व बॅक पॅनल | ४०,००,००० |
| ४ | रेड एफ.एम. रेडिओ | ५,००,००० |
| | **एकूण रक्कम रुपये** | **१,२०,००,०००** |

सदर रक्कम ही क्र. के-४, मुख्यलेखाशिर्ष-२२३०-कामगार व सेवायोजन, ०१-कामगार, १११ कामगारांसाठी सामाजिक सुरक्षितता, राज्य योजनांतर्गत योजना (००) (१४) बालकामगार प्रतिबंध अधिनियम १९८६ (२२३०५८२८) या उपशीर्षाखाली अर्थसंकल्पित केलेल्या निधीतून खर्च करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी प्रस्तावातील कामांवर प्रचलित पध्दतीप्रमाणे तसेच, आवश्यक तेथे सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १९.०१.२०१३ च्या मा.मुख्य सचिव यांच्या स्वाक्षरीने निर्गमित झालेल्या शासन निर्णयाच्या अनुषंगाने ई-निविदा कार्यप्रणालीस अनुसरुनच खर्च करण्यात यावी. तसेच यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. यासाठी नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून कामगार आयुक्त कार्यालयाचे संबंधित नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी काम पहातील.

सदर शासन निर्णय हा शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक : अर्थसं-२०१५/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.०४.२०१६, शासन परिपत्रक उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्रमांक : बीयुडी-२०१६/२०१६-१७/(प्र.क्र.५०)/ प्रशासन-१, दि.०६.०५.२०१६ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०११७४१४४८०१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Meghashyam B Nawar

Digitally signed by Meghashyam B Nawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=IEL Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=7d2d0d7e2120f3814eff2bd1a5d3c902860ebecbe995c3b2260a01b762f45c3a, serialNumber=a5505efe2f8776471817f30ce3446f37d84d8aedd d35d8e3a76a12d1b08434dd, cn=Meghashyam B Nawar
Date: 2016.12.01 17:45:55 +05'30'

**(मेघःश्याम नवार)**
**कक्ष अधिकारी**

**प्रति,**

१) कामगार आयुक्त, कामगार आयुक्त कार्यालय, बांद्रा-कुर्ला संकुल, बांद्रा (पूर्व), मुंबई ५१.
२) महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय
५) प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक
६) सह सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक
७) कक्ष अधिकारी (प्रशासन-१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
८) कक्ष अधिकारी (प्रशासन-२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवड नस्ती, कामगार-४